**नवी मुंबई महानगरपालिका आस्थापनेवरील आर.सी. एच. कार्यक्रमांतर्गत मानधन तत्वावर कार्यरत एकूण ११ कर्मचाऱ्यांच्या नेमणूका विहीत मार्गाचा अवलंब करून झाल्याने, सदर कर्मचाऱ्यांना आकृतीबंधातील मंजूर व <u>रिक्त पदांवर कायम करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नमुंम-१२२१/प्र.क्र.१३/नवि-२८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०४ मार्च, २०२४

<u>वाचा</u> : १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. १२१५/३९४/प्र.क्र.१६/१५/नवि-२८, दि.२१.०८.२०१७.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.नमुंम-१२१९/प्र.क्र.१३७/नवि-२८, दि.३०.०१.२०२१.
३) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. १२२२/प्र.क्र.१२४/नवि-२८, दि.१५.१२.२०२२.
४) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंमपा/प्रशासन/आस्था-०५/प्र.क्र. / ४४९३/२०२१, दि.१४.१२.२०२१

**<u>प्रस्तावना</u>: -**

नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवर "प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ अंतर्गत" -लिपिक, डेटा एंट्री ऑपरेटर, शिपाई व वाहनचालक॰ पदावर करार पध्दतीने मानधन तत्वावर कार्यरत कर्मचाऱ्यांना, इतर महानगरपालिकांमध्ये ज्याप्रमाणे रोजंदारीवरील कार्यरत कर्मचाऱ्यांचे कायमस्वरूपी समावेशन करण्यात आले आहे. त्याच धर्तीवर नवी मुंबई महानगरपालिकेमधील करार पध्दतीवरील आर.सी.एच. (RCH) फेज-२ अंतर्गत कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांना, नवी मुंबई महानगरपालिका आकृतीबंधातील मंजूर व रिक्त पदावंर नियमित समावेशन करणेबाबत शासन स्तरावर निर्णय घेण्याची आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी विनंती केली आहे.

२. नवी मुंबई महानगरपालिकेचा आकृतीबंध दि.२१.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला आहे. सदर आकृतीबंधात लिपिक-५, डेटा एंट्री ऑपरेटर-१, शिपाई-४ व वाहनचालक-१ ही पदे मंजूर असून रिक्त आहेत. आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे प्रस्तावाचे अवलोकन केले असता, नवी मुंबई महानगरपालिका आस्थापनेवर करार पध्दतीने मानधन तत्वावर कार्यरत ११ कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या ह्या विहीत प्रक्रियेने (जाहिरात/लेखी परिक्षा/ मुलाखत) झालेल्या आहेत. त्यामुळे विहीत मार्गाने नियुक्त झालेल्या ११ कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या कायम करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>: -**

नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील "प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम फेज-२ अंतर्गत" (१) लिपिक-५, (२) डेटा एंट्री ऑपरेटर-१, (३) शिपाई-४ व (४) वाहनचालक-१ या संवर्गातील एकूण ११ कर्मचाऱ्यांच्या नेमणूका ह्या (जाहिरात/लेखी परीक्षा/मुलाखत) या विहीत मार्गाचा अवलंब करून झालेल्या असल्याने सदर कर्मचाऱ्यांना महानगरपालिकेच्या आस्थापनेवर, आकृतीबंधातील मंजूर व रिक्त पदांवर त्यांची कायम नियुक्ती करून, त्यांना महानगरपालिका सेवेत नियमित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. विवरणपत्र -अ॰ नुसार असलेल्या सदर ११ कर्मचाऱ्यांना, नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवर, आकृतीबंधातील मंजूर व रिक्त पदांवर पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून कायम नियुक्ती देण्यात येत आहे:-

***अटी व शर्ती :-***

१) नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवर आरसीएच फेज-२ अंतर्गत कार्यरत असलेले लिपिक-५, डेटा एंट्री ऑपरेटर-१, शिपाई-४ व वाहनचालक-१ या कर्मचाऱ्यांचे समायोजन महानगरपालिकेच्या मंजूर आकृतीबंधातील समकक्ष रिक्त पदांवर करण्यात यावे. तसेच ज्या पदावर त्यांचे समायोजन करण्यात येईल त्या पदाची अर्हता त्यांनी पूर्ण करणे आवश्यक आहे.

२) नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवर आरसीएच फेज-२ अंतर्गत कार्यरत असलेले कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कोणाचेही समायोजन करता येणार नाही.

३) या कर्मचाऱ्यांना समावेशनाच्या दिनांकापासून कायम सेवेचे तद्अनुषंगिक लाभ (वेतन, सेवा जेष्ठता, निवृत्तीवेतन इत्यादी) देय राहतील.

४) समायोजन करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांचे पद त्यांच्या सेवानिवृत्ती किंवा इतर कारणास्तव रिक्त झाल्यास सदर पद महानगरपालिकेच्या सेवा प्रवेश नियमानुसार विहीत प्रक्रियेचा अवलंब करून भरणे बंधनकारक राहील.

५) सदर कर्मचाऱ्यांना यापूर्वी केलेल्या सेवेचे कोणतेही लाभ अथवा थकबाकी अनुज्ञेय नसेल.

६) सदर कर्मचाऱ्यांच्या वेतनाकरीता कोणताही निधी शासनाकडून उपलब्ध करून दिला जाणार नाही.

७) सेवेत कायम करण्यापूर्वी संबंधित कर्मचाऱ्यांकडून बंधपत्र घेऊन मागील कोणताही लाभ मिळणार नाही याचा स्पष्ट उल्लेख करावा लागेल.

८) सदर कर्मचाऱ्यांना स्थायी करण्याच्या आदेशाच्या दिनांकापासून ०६ महिन्याच्या कालावधीत चारित्र्य पडताळणी अहवाल सादर करणे बंधनकारक राहील.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२४०३०४१५४५४१६९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUSHILA DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2024.03.04 15:54:56 +05'30'

**( सुशिला पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त तथा प्रशासक, नवी मुंबई महानगरपालिका, जि.ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि २), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
४) उप सचिव (नवि-२८), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती (नवि-२८)

**शा.नि.क्र.नमुंम-१२२१/प्र. क्र. १३/नवि-२८, दि. ०४ मार्च, २०२४ सोबतचे**

**"विवरणपत्र-अ"**

| अ.क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | श्रीमती संगीता अरविंद तुपे | लिपिक |
| २ | श्रीमती सुरेखा पुंडलीक तायडे | लिपिक |
| ३ | श्री. सतीश मुकुंद शिंदे | लिपिक |
| ४ | श्रीमती अंजली सुरेश हजारे | लिपिक |
| ५ | श्री. निलेश येसाजी तारमळे | लिपिक |
| ६ | श्रीमती संगीता सुरेंद्र येरम | डेटा एंट्री ऑपरेटर |
| ७ | श्री. अरविंद मुरलीधर कांबळे | शिपाई |
| ८ | श्री. तुकाराम यशवंत गांगड | शिपाई |
| ९ | श्री. संतोष शांताराम मोरे | शिपाई |
| १० | श्रीमती प्रेमा वसंत पडधन | शिपाई |
| ११ | श्री. विजय सलतान राठोड | वाहन चालक |

*********

SUSHILA
DHONDIRAM
PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c2847856 2c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE149259 3ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2024.03.04 15:55:23 +05'30'